**सन २०२४-२५ करिता राष्ट्रीय कृषि विकास योजना कॅफेटरिया - DPR योजनेंतर्गत अनुसूचित जाती रु.१०.०० लक्ष व अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता रु.८.३३ लक्ष इतका निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. राकृवि-०६२४/प्र.क्र.१३८/१४-अे**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ०७ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :** १. कृषि व शेतकरी कल्याण विभाग,कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. 13-22/2023-PC,दि.१४ डिसेंबर,२०२३.

२. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.७-१/२०२३-RKVY/१, दि. ०१ ऑगस्ट, २०२३.

३. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.

४. राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया राज्यस्तरीय मंजुरी समितीच्या (SLSC) दि.०३ मे,२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

४. कृषि व शेतकरी कल्याण विभाग,कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.७-१/२०२४-RKVY, दि.१४ मे, २०२४.

५. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.राकृवि-०५२४/प्र.क्र.१२९/१४-अे, दि.२८ मे, २०२४.

६. कृषि व शेतकरी कल्याण विभाग,कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.१-१५/२०२४-RKVY, दि.०३ जून, २०२४.

७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९ /अर्थसंकल्प (विघयो), दि.०३ जुलै, २०२४.

८. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.७/कार्यासन-६, दि.०२ जुलै, २०२४.

९. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.राकृवि-०६२४/प्र.क्र.१३८/१४-अे, दि.०५ जुलै, २०२४.

१०.कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.राकृवि-०६२४/प्र.क्र.१३९/१४-अे, दि.०५ जुलै, २०२४.

११.वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.

१२.आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.२/कार्यासन-६, दि.०१ ऑगस्ट, २०२४.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरिया ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येते. राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया

योजनेंतर्गत DPR या घटकासाठी सन २०२४-२०२५ करिता मंजूर वार्षिक कृती आराखड्यानुसार संदर्भ क्र.५ येथील दि.२८ मे, २०२४ च्या शासन निर्णयान्वये रु.२९३.२९ कोटी इतक्या रक्कमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आली आहे.

२. कृषि व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांनी संदर्भ क्र.६ येथील दि.०३.०६.२०२४ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना (DPR) अंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीकरिता अनुसूचित जाती प्रवर्गाचा रु.८.३५ कोटी (केंद्र हिस्सा रु. ५.०१ कोटी + राज्य हिस्सा रु. ३.३४ कोटी) व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा रु. ६.६० कोटी (केंद्र हिस्सा रु. ३.९६ कोटी + राज्य हिस्सा रु. २.६४ कोटी) निधी अनुक्रमे संदर्भ क्र.९ व १० येथील शासन निर्णयान्वये वितरीत केला आहे.

३. केंद्रीय कृषि मंत्रालयाने संदर्भ क्र. ३ अन्वये राज्य शासनास दिलेल्या अधिकारानुसार सन २०२४-२५ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत वनशेती उपलअभियान घटकासाठी प्राप्त अनुसूचित जाती प्रवर्गाचा केंद्र हिस्सा रु.६.०० लक्ष व त्यासमकक्ष राज्य हिस्सा रु.४.०० लक्ष तसेच अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिस्सा रु.५.०० लक्ष व त्यासमकक्ष राज्य हिस्सा रु.३.३३ लक्ष इतका निधी राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरिया (DPR Based stream) या घटकासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. या शासन निर्णयान्वये सन २०२४-२५ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना (DPR) या योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरिया (DPR Based stream) या घटकासाठी अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता आयुक्त (कृषि) यांना यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे -

(रुपये)

| | **अनु. जाती प्रवर्ग** | **अनु. जमाती प्रवर्ग** | **एकूण** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| केंद्र हिस्सा | ६,००,००० | ५,००,००० | ११,००,००० |
| राज्य हिस्सा | ४,००,००० | ३,३३,३३३ | ७,३३,३३३ |
| एकूण | **१०,००,०००** | **८,३३,३३३** | **१८,३३,३३३** |

२. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून

घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या केंद्र व राज्य हिस्स्याच्या पुढीलप्रमाणे अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गाच्या लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा -

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| अनुसूचित जाती | **मागणी क्रमांक एन -३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना<br>(०१) (१५) कृषि उन्नती योजना -<br>राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(६०% केंद्र हिस्सा) (कार्यक्रम)<br>(२४०१ बी२२१) ३३-अर्थसहाय्य | **मागणी क्रमांक एन -३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना<br>(०१) (१६) कृषि उन्नती योजना -<br>राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(४०% राज्य हिस्सा) (कार्यक्रम)<br>(२४०१ बी२३२) ३३-अर्थसहाय्य |

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| अनुसूचित जमाती | मागणी क्रमांक टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१-जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (३२) कृषि उन्नती योजना -<br>राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(६०% केंद्र हिस्सा) (कार्यक्रम)<br>(२४०१ ए७४४) ३३-अर्थसहाय्य | मागणी क्रमांक टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१-जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (३३) कृषि उन्नती योजना -<br>राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(४०% राज्य हिस्सा) (कार्यक्रम)<br>(२४०१ ए७५३) ३३-अर्थसहाय्य |

३. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी वितरीत केलेला रु.१८,३३,३३३/- निधी कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या Singal Nodal Account (SNA) मध्ये जमा करावा आणि तद्नंतर सदर निधी संबंधित प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी PFMS व्दारे विविध अंमलबजावणी यंत्रणांना त्यांच्यासाठी उघडलेल्या Child Account मध्ये वर्ग करावा.

४. राष्ट्रीय कृषि विकास योजना (DPR) अंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त निधी मागणी, प्रकल्पाची तातडी, अंतिम टप्प्यावरील प्रकल्प व निधी लवकरात लवकर

खर्च होणे इ. बाबी विचारात घेऊन प्रकल्पांचा प्राधान्यक्रम आयुक्त (कृषि) यांच्या स्तरावर निश्चित करण्यात यावा. त्यानुसार या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना (DPR) अंतर्गत अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गाकरिता वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे प्रकल्पनिहाय वितरण आयुक्त (कृषि) यांच्या मान्यतेने करण्यात यावे.

५. उपरोक्त मंजूर निधीचे तात्काळ उपयोजन होण्याच्या दृष्टीनेच कोषागरातून आहरण करावे आणि सर्व विभागांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या निधीचा तात्काळ विनियोग करावा, अंमलबजावणी यंत्रणांनी निधी उपयोजनाविना बँक खात्यामध्ये जमा करुन ठेवू नये.

६. सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी/विभागांनी त्यांना सन २००७-०८ ते सन २०२३-२४ या कालावधीत वितरीत केलेल्या निधीचे सनदी लेखापालांकडून लेखापरिक्षण झाल्याचे प्रमाणित करावे.

७. या शासन निर्णयान्वये केवळ -अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गाकरिता निधी वितरीत करण्यात आला असून सर्व विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी त्यांना मंजूर केलेल्या प्रकल्पांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी आवश्यक असलेल्या निधीकरिता उपरोक्त रकमेचा विनियोग करावा.

८. वैयक्तिक लाभाच्या प्रकल्पांतर्गत सर्व विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) अनुदान वितरीत करावे.

९. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८० /अर्थ-३, दि.२५/०७/२०२४ तसेच आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.२/ कार्यासन-६, दि.०१/०८/२०२४ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०७१७१६०२२००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.08.07 17:30:34 +05'30'

**( महेंन्द्र सो. घाडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

२. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव यांचे स्वीय सहायक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
१०.प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११.प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व), महाराष्ट्र राज्य.
१३.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे.
१४. वित्त विभाग (व्यय- १४/अर्थसंकल्प), मंत्रालय मुंबई,
१५. नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई,
१६. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (कार्या-विघयो), मंत्रालय, मुंबई.
१७. आदिवासी विकास विभाग (कार्या-६), मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती (कार्या-१४अे).